''भंगी'',''रुखी'' किंवा ''बाल्मिकी'' या
जातींना प्रमाणपत्र देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक :- सीबीसी १०९५/१२३१०/२२०/प्र.क्र. ५२१ /मावक-५,**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- १६ एप्रिल २००३**

**वाचा :-** १)शासन परिपत्रक, समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्र.एसबीसी-१०९५/ १२३१०/२२०/प्र.क्र.५२१/मावक-२, दि. ९ नोव्हेंबर २०००.
२) अध्यक्ष, मुंबई प्रदेश हरिजन भंगी युवक सेवा समाज यांचे दि. २८.८.२००२ चे पत्र.

## प रि प त्र क

वर उल्लेखिलेल्या अ.क्र.१ येथील शासन परिपत्रक, दि. ९ नोव्हेंबर २००० अन्वये खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात आलेल्या होत्या :-

१) शासनाचे प्रशासकीय विभाग (मंडळे,महामंडळे,प्राधिकरणासह) आणि शाळा/महाविद्यालये (सरकारी व बिगर सरकारी (खाजगी) विद्यापीठे व इतर संस्था याठिकाणी दप्तरातील अभिलेख्यात ज्याठिकाणी "भंगी" या शब्दाचा शब्दप्रयोग करण्यात आले आहे त्याठिकाणी यापुढे "रुखी" किंवा "बाल्मिकी" असा शब्दप्रयोग करावा.
२) वरील सुधारणा (बदल) हा ग्रामपंचायत व इतर महसूली अभिलेख्यातदेखील करावा.
३) मागासवर्गीय वस्ती असलेला जो भाग (शहराचा/गावाचा/रस्ता, विभाग) "भंगीवाडा" म्हणून ओळखला जातो / संबोधला जातो त्या भागास "रुखीवाडा" किंवा "बाल्मिकीवाडा" म्हणून ओळखले जावे / संबोधले जावे.

२. वर नमूद केलेले परिपत्रक "रुखी" किंवा "बाल्मिकी" या शब्दाचा शब्दप्रयोग दैनंदिन व्यवहार, व्यावहारिक देवाणघेवाण व प्रचलित शासकीय पत्रव्यवहारात व्हावा या उद्देशाने काढण्यात आले आहे. परंतु याचा कोणताही विपरित परिणाम संविधानात उल्लेखिलेल्या शब्द किंवा तत्सम शब्द, सफाई कामगार बंधूसाठी केलेल्या कायदेशीर तरतूदीवर आणि त्यानुसार त्यांना मिळत असलेल्या फायद्यांवर होणार नाही.

३. अनुसूचित जातीच्या यादीमध्ये अ.क्र.१२ वर "भंगी" या जातीचा समावेश आहे व त्या जातीची तत्सम जात म्हणून "रुखी" व "बाल्मिकी" या जातींचा समावेश केलेला आहे. "भंगी" ऐवजी "रुखी" व "बाल्मिकी" असा उल्लेख करण्याबाबतच्या सूचना या विभागाच्या संदर्भाधीन अ.क्र.१ येथील परिपत्रकांन्वये सर्व संबंधितांना देण्यात आलेल्या आहेत. त्यास अनुसरुन शासन आता असे आदेश देत आहे की, " भंगी ", "रुखी" व " बाल्मिकी या तीन्ही जाती अनुसूचित जाती म्हणून अधिसूचित केलेल्या असल्यामुळे अर्जदार ज्या जातीबद्दलचे आवश्यक ते पुरावे सक्षम प्राधिका-याकडे सादर करीत असतील व ज्यांना "रुखी" किंवा "बाल्मिकी" जातीचे प्रमाणपत्र हवे असेल त्यांना तसे प्रमाणपत्र दिले जावे व ज्यांना "भंगी" जातीचे प्रमाणपत्र हवे असेल त्यांना "भंगी" जातीचे प्रमाणपत्र देण्यात यावे.

[ कृ.मा.पहा

H-247 (1000-4-03)

२. सर्व मंत्रालयीन विभागांनी सदर आदेश त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणून याबाबत तात्काळ अंमलबजावणी करण्याबाबत कळविण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

वैअपारकर

(वै. अ. पारकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति :-
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२, मुंबई / नागपूर,
सर्व विभागीय आयुक्त,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा),मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक,शिक्षण, महाराष्ट्र राज्य,पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व जिल्हा दंडाधिकारी,
सर्व उप विभागीय आयुक्त (महसूल),
सर्व उप जिल्हाधिकारी,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,मुंबई,
सर्व जिल्हापरिषदा, मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व तालुका कार्यकारी दंडाधिकारी,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हापरिषद, समाजकल्याण अधिकारी,
सर्व कार्यासने,सा.न्या.सां.का.क्री.व वि.स.विभाग,
निवड नस्ती,का-मावक-५

---x---x---